**मौजे दारवली, ता.मुळशी, जि.पुणे येथील जमीन गट नं.४५९ मधील १ हे. ६०. आर क्षेत्र पोलीस स्टेशन, पौड यांच्या इमारत व पोलीस कर्मचारी / अधिकारी निवासस्थान बांधण्याकरीता गृह विभाग (जिल्हा पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण) प्रदान करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन ज्ञापन क्र.जमीन ३४१७/प्र.क्र.५५/ज-५**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ०२ /०३/२०२३

**संदर्भ:-** १) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.मह/२/जमीन/पुणे/जागामागणी/सीआर/४७/२०१७, दि.१६/१०/२०१७ व दि.०४/०१/२०२१.
२) पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण यांचे दि.२९/०१/२०१७ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

विभागीय आयुक्त यांच्या संदर्भाधीन प्रस्तावानुसार मौजे दारवली, ता.मुळशी, जि.पुणे येथील गायरान जमीन गट नं.४५९ मधील १ हे. ६० आर क्षेत्र पोलीस स्टेशन, पौड यांच्या इमारत व पोलीस कर्मचारी / अधिकारी निवासस्थान बांधण्याकरीता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन ज्ञापन:-**

विभागीय आयुक्त, पुणे यांचा प्रस्ताव, शासनाच्या गृह विभाग, ग्रामविकास विभाग व वित्त विभागाने दिलेली सहमती/अभिप्राय याअनुषंगाने महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम २२-अ व ४० व महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट लावणे) नियम, १९७१ च्या नियम ५ तसेच शासन निर्णय दि.१२/०७/२०११ मधील तरतूदीनुसार मौजे दारवली, ता.मुळशी, जि. पुणे येथील स.नं.४५९ मधील १ हे. ६० आर. इतकी गायरान जमीन पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण (गृह विभाग) यांना “पोलीस स्टेशन पौड यांच्या इमारत व कर्मचारी/अधिकारी निवासस्थान बांधकाम करणे” या शासकीय प्रयोजनासाठी महसूलमुक्त किंमतीने व भोगवटामूल्यरहित पध्दतीने कब्जेहक्काने तसेच खालील अटी व शर्तीच्या अधीनतेने प्रदान करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) विषयांकित जमीन गृह विभाग (पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण) हे भोगवटादार वर्ग-२ म्हणून धारण करतील.

२) शासनाच्या महसूल व वन विभागाच्या पूर्व परवानगीशिवाय सदर जमीन किंवा तिचा कोणताही भाग किंवा तिच्यातील कोणतेही हितसंबंध विक्री/देणगी देऊन/अदला बदल करुन/गहाण

ठेऊन/पट्टयाने देऊन/खाजगी-सार्वजनिक सहभाग तत्वावर किंवा बाह्य यंत्रणाद्वारे किंवा अन्य कोणत्याही प्रकारे हस्तांतरीत करता येणार नाही. सदर जमिनीवर अथवा त्याच्या कोणत्याही भागावर अन्य व्यक्ती/संस्था/कंपनी इत्यादींचे कोणत्याही प्रकारचे हक्क निर्माण होतील अशा प्रकारे कोणताही आर्थिक व्यवहार करता येणार नाही. तसेच शासनाच्या महसूल व वन विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय सदर जमिनीचे पोट विभाजन करता येणार नाही.

३) गृह विभाग (पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण) हे विषयांकित शासकीय जमिनीचा वापर केवळ मंजूर प्रयोजनासाठी करील. अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी सदर जमिनीचा अथवा त्याच्या कोणत्याही भागाचा तात्पुरता अथवा कायमस्वरुपी वापर करावयाचा झाल्यास त्यासाठी शासनाच्या महसूल व वन विभागाची पूर्वमान्यता आवश्यक राहील.

४) सदर जमिनीचा ताबा मिळाल्यापासून **३ वर्षांच्या आत** मंजूर प्रयोजनासाठी वापर सुरु करणे बंधनकारक राहील.

५) विषयांकित जमिनीवर संबंधित नियोजन प्राधिकरणाच्या विहित परवानगीने व मंजूर विकास नियंत्रण नियमावलीनुसार विकास होणे बंधनकारक राहील. तसेच या व्यतिरिक्त अन्य संबंधित विभाग/शासकीय यंत्रणा यांची मान्यता/पूर्वपरवानगी/ना-हरकत घेणे देखील बंधनकारक राहील.

६) संबंधित शासकीय जमीन शासनास अथवा शासनाच्या नामनिर्देशित कोणत्याही शासकीय यंत्रणांना, कोणत्याही सार्वजनिक प्रयोजनार्थ अथवा सार्वजनिक प्रकल्पाकरिता आवश्यक असेल तर अशी जमीन परत ताब्यात घेण्याची मुभा शासनास राहील.

७) विषयांकीत जमिनीची मोजणी प्रतिग्रहिता विभागाने संबंधित उप अधीक्षक, भुमी अभिलेख यांच्याकडून करुन जागेचे डिमार्केशन करुन घेणे बंधनकारक राहील.

८) सदर जमिनीवरील नियोजित प्रयोजनामुळे लगतच्या खातेदारांना कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही, त्यांच्या वैध वहीवाटीस बाधा येणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) सदर जमिनीचा शासन मान्यतेने प्रस्तुत प्रयोजनासाठी वापर होणार असल्याने जमीन गायरान संवर्गातून कमी करण्याबाबत जिल्हाधिकारी, पुणे यांनी आवश्यकती कार्यवाही करावी.

१०) शासकीय जमीन मंजूरी संदर्भातील इतर नियमित अटी व शर्ती या ठिकाणी लागू राहतील.

११) जिल्हाधिकारी, पुणे यांना स्थिती-कालानुरूप आवश्यक वाटतील अशा अन्य अटी व शर्ती विहित करण्याची मुभा राहील.

१२) वरील अटी/शर्तीपैकी कोणत्याही अटी/शर्तीचा भंग झाल्यास शर्तभंगाबाबत सदर जमीन शासन जमा करण्याचा अधिकार शासनास राहील.

सदर शासन ज्ञापन गृह विभाग अनौ.सं.क्र.३१/पोल-७, दि.११/०४/२०१८ व वित्त विभाग अनौ.सं.क्र.११६/२०२१/व्यय-९, दि.०७/०४/२०२१ अन्वये दिलेल्या अभिप्राय/ सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात असून त्याचा संकेतांक २०२३०३०२१७५१२१९९१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून उपलब्ध करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SHRIRAM DATTATRAYA YADAV
Date: 2023.03.02 17:56:37 +05'30'

**( श्रीराम यादव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, पुणे.

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री महोदय यांचे सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा/परिषद, विधानभवन, मुंबई.
५) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९) विभागीय आयुक्त, पुणे.
१०) जिल्हा पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण, पुणे.
११) जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, पुणे.
१२) मा.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
१३) निवडनस्ती, कार्यासन ज-५ , महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.